**अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करणे या योजनेंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: अनौसं-२०१८/प्र.क्र. २५५/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १९ डिसेंबर, २०१८.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करणे या योजनेंतर्गत सन २०१८-१९ साठी अर्थसंकल्पित निधी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ अन्वये एकूण वार्षिक तरतुदीच्या ७०% मर्यादेत खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे, त्याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

(रुपये हजारात)

| अ.क्र. | योजनेचे नांव | अर्थसंकल्पीत निधी सन २०१८-१९ | अर्थसंकल्पीत निधीच्या ७०% निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करणे<br>६२२५ ०२२ २, ५५,<br>कर्जे व आगाऊ रकमा | २,००,०००<br>(अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) | १,४०,०००<br>(अक्षरी रुपये चौदा कोटी फक्त) |

२. नियंत्रण अधिकारी यांनी विवरणातील रकाना ४ मधील प्राप्त निधी (७०%) खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्यात यावे.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल,२०१८ मधील तपासणी सूचीमध्ये नमूद केल्यानुसार प्रत्येक अटीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक एन-४, मुख्य लेखाशीर्ष ६२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणासाठी कर्जे, ०१, अनुसूचित जातींचे कल्याण, ८००, इतर कर्जे, (०१) अनुसूचित जातींना कर्जे, (०१) (०१)अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना कर्जे (कार्यक्रम) (६२२५ ०२२ २),५५, कर्जे व आगाऊ रकमा या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील अटींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधीन राहून निधी वितरीत करण्यात यावा.

६. सदर ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारांतर्गत आणि विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२२४१४२८४६५१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.12.24 14:33:45 +05'30'

( दि. रा. डिंगळे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
६.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
७.सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-१४ / अंर्थसकल्प-३), मंत्रालय, मुंबई - ३२.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /अजाक